**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत जहाल डाव्या विचारसरणीने प्रभावित गडचिरोली जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समिती अहेरी व चामोर्शी आणि त्यांचे उप-बाजार येथे पणनविषयक पायाभूत सुविधा विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्रमांक राकृवियो २००९/प्र.क्र.१२४/२१-स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २७/०९/२०१०

**वाचा :-**
१) सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. ६२९/तां/ दरसूची २००९१०/२०१०, दि. २८.०१.२०१०.
२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक राकृवि-२००९/प्र.क्र.९०/राकृवियो कक्ष, दि. ३१.०३.२०१०
३) Letter from Agriculture and ADF Dept, GoM, No. MET-2010/C.R.4/RKVY CELL, dt. 10.08.2010
४) पणन संचालनालयाचे पत्र क्रमांक पणन-५/कृउबास/स्थापत्य/ चार्मोशी/बां.मं./७९१६/१०, दिनांक ०८.०९.२०१०.
५) पणन संचालनालयाचे पत्र क्रमांक पणन-५/कृउबास/स्थापत्य/ चार्मोशी/बां.मं./७९१७/१०, दिनांक ०८.०९.२०१०.
६) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक राकृवि-२०१०/प्र.क्र.४/राकृवियो कक्ष, दिनांक १४.०९.२०१०.

**प्रस्तावना :**

जहाल डाव्या विचारसरणीने राज्यातील प्रभावित जिल्हयांमधील कृषि उत्पन्न बाजार समित्यांची आर्थिक परिस्थिती बेताची असल्याने या बाजार समित्या स्व-निधी गुंतवून वा बँकांकडून कर्ज घेऊन केंद्र शासनाच्या पणन विषयक पायाभूत सुविधा विकासाच्या ' डेव्हलपमेंट ऑफ मार्केटींग इन्फ्रास्ट्रक्चर व ग्रेडींग अँड स्टॅण्र्डडायझेशन ' या योजनांचा लाभ घेऊ शकत नाहीत, ही बाब लक्षात घेऊन केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे सदर जिल्हयातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये पणन विषयक पायाभूत सुविधा विकासाचे प्रकल्प राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत हाती घेण्यात येत आहेत. राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दिनांक २६.०३.२०१० रोजी पार पडलेल्या ७ व्या बैठकीत गडचिरोली जिल्हयातील अहेरी व चामोर्शी कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या पणन विषयक पायाभूत सुविधा विकासाच्या प्राप्त प्रकल्प अहवालांना (DPR) मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ व ६ येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागाने सदर प्रकल्पांना प्रकल्प किंमतीच्या ७५%

म्हणजेच एकूण रु. ९.२३ कोटी निधी अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन दिलेला असून या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता पुढील मार्गदर्शक सूचना विहीत करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :**

१. या प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता सर्वंकष संनियंत्रण, मुल्यमापन व मार्गदर्शनाकरीता महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाची 'नोडल एजन्सी' म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीकरीता सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे यांची संनियंत्रण अधिकारी (Monitoring Officer) म्हणून नेमणूक करण्यात येत असून त्यांनी प्रकल्पाच्या कामाचे नियोजन करुन संबंधित बाजार समित्यांमार्फत प्रकल्पाची अंमलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण करावी.

३. कृषि उत्पन्न बाजार समिती, अहेरी आणि कृषि उत्पन्न बाजार समिती, चामोर्शी यांनी सादर केलेल्या मुळ प्रकल्प अहवालाप्रमाणे त्यांच्या प्रकल्पांची किंमत अनुक्रमे रु. २३२.०२ लाख व रु. ९९९.०६ लाख इतकी होती त्यानुषंगाने राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने दिलेल्या मंजूरीप्रमाणे सदर प्रकल्पांच्या आर्थिक सहाय्याचा आराखडा खालीलप्रमाणे राहील.

**(रक्कम लाखात)**

| **मंजूर वित्तीय आराखडा** | **कृषि उत्पन्न बाजार समिती, अहेरी** | **कृषि उत्पन्न बाजार समिती चामोर्शी** |
|---|---|---|
| राष्ट्रीय कृषि विकास योजनेतून अनुदान (७५%) | १७४.०१५ | ७४९.२९५ |
| संबंधित बाजार समितीचा स्व-निधी (१०%) | २३.२०२ | ९९.९०६ |
| वित्तीय संस्थांचे अथवा महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाचे कर्ज (१५%) | ३४.८०३ | १४९.८५९ |
| **मंजूर एकूण प्रकल्प किंमत** | **२३२.०२०** | **९९९.०६०** |

४. सदर प्रकल्पाकरीता बाजार समित्यांना उपरोक्त सुधारीत प्रकल्प किंमतीच्या ७५% अनुदान राष्ट्रीय कृषि विकास योजनेतुन उपलब्ध करुन देण्यात आले असून उर्वरित २५% निधी बाजार समित्यांनी गुंतवावयाचा आहे, त्यापैकी प्रकल्प किंमतीच्या किमान १०% निधी संबंधीत कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी स्व-निधी म्हणून गुंतविणे बंधनकारक असुन बाजार समित्यांनी उर्वरित प्रकल्प किंमतीच्या १५% निधी व्यापारी बँका अथवा महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळातर्फे कर्ज घेऊन उभारावा तथापि सदर कर्जाचे संपूर्ण दायित्व संबंधित बाजार समित्यांचेच राहील.

५. कृषि उत्पन्न बाजार समिती, अहेरी व चामोर्शी यांनी सादर केलेले प्रकल्प अहवाल व मुळ प्रकल्प किंमत सन २००८-०९ च्या जिल्हा दर सूचीवर (D.S.R.) आधारीत असून सदर प्रकल्प मंजूर होण्यापूर्वी संदर्भ क्र. १ येथील सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर यांच्या दिनांक २८.०१.२०१० रोजीच्या पत्रान्वये गडचिरोली जिल्हयातील नक्षलग्रस्त भागासाठी विशेष उपाययोजना अंतर्गत जिल्हयातील सर्व कामांसाठी यापुढे २०% जादा दर आकारावेत व हे २०% जादा दर या क्षेत्रातील कामांसाठी लागू असणा-या इतर अतिरिक्त वाढींशिवाय जास्तीचे म्हणून समजण्यात यावेत अशी

सुधारणा करण्यात आलेली आहे व ही दरवाढ दि. १.२.२०१० पासून मान्य करण्यात आली असल्याचे लक्षात घेता, बाजार समित्यांच्या मुळ प्रकल्प अहवालाप्रमाणे अंतर्भूत असणा-या सर्व घटकांची (Components) उभारणी मंजूर निधीमधून पूर्ण होणे शक्य नाही. सबब, बाजार समित्यांमधील सध्याच्या उपलब्ध पायाभूत सुविधा व स्थानिक कृषिमालाच्या अनुषंगाने पायाभूत सुविधांची आवश्यकता लक्षात घेऊन या प्रकल्पांतर्गत संबंधित बाजार समित्यांमध्ये हाती घ्यावयाच्या कामाचा घटकनिहाय (Componentwise) फेरआढावा घेऊन, पणन संचालकांनी संदर्भ क्र. ४ व ५ अन्वये शिफारस केलेल्या सर्व घटकांची उभारणी प्रकल्पाकरीता उपरोक्तप्रमाणे मंजूर वित्तीय आराखडयाच्या मर्यादेत राहुनच घेतली जातील याची दक्षता संबंधित कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी तसेच महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने घ्यावी. त्याचप्रमाणे एखाद्या घटकाकरीता मंजूर निधीपेक्षा अधिकचा खर्च अथवा एखादा अधिकचा घटक घ्यावयाचा झाल्यास त्याचा संपूर्ण खर्च बाजार समितीने स्वतःच्या अतिरिक्त गुंतवणूकीतुन आणि सक्षम प्राधिका-यांच्या परवानगीने विहित पध्दतीने करावा.

६. संबंधित कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी या प्रकल्पातील सर्व स्थापत्यविषयक व इतर तत्सम कामे स्पर्धात्मक निविदा प्रक्रियेव्दारे पूर्ण करावीत व त्याकरिता महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने नियुक्त केलेल्या अभियंत्यांच्या उपस्थितीत बाजार समित्यांनी निविदा प्रक्रिया राबवावी तसेच यशस्वी निवीदा धारकांना तात्काळ कामाचे आदेश (work order) निर्गमित करुन सदरची कामे विहीत कालावधीत पूर्ण होतील याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे बाजार समित्यांनी पणन मंडळास वेळोवेळी कामाच्या प्रगतीचा आढावा सादर करावा.

७. याकामी संबंधित बाजार समितीच्या विनंतीप्रमाणे, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाच्या अभियंत्यांनी संबंधित बाजार समित्यांना वेळोवेळी प्रत्यक्ष भेट देऊन पूर्ण झालेल्या कामाचा प्रत्यक्ष आढावा घेऊन पणन मंडळास कार्यपूर्ती अहवाल व देयके प्रमाणित करुन सादर करावीत.

८. संबंधित कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी प्रथमतः प्रकल्पातील त्यांच्या वाटयाचा २५% निधीचा विनियोग करावा व घटकनिहाय पूर्ण होणा-या प्रत्येक कामाची देयके वेळोवेळी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास सादर करावीत. बाजार समित्यांची अशी देयके प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून १० कार्यालयीन दिवसांमध्ये पणन मंडळाने संदर्भांकीत २ व ६ येथील शासन निर्णयान्वये एकूण मंजूर रु. ९.२३ कोटी निधीतुन संबंधित बाजार समित्यांना RTGS सुविधेव्दारे निधी उपलब्ध करुन द्यावा.

९. हा प्रकल्प राज्यातील नक्षलग्रस्त व मागास असलेल्या गडचिरोली जिल्हयातील बाजार समित्यांमध्ये राबविण्यात येत असल्याने तसेच या प्रकल्पाकरीता प्रकल्प अहवाल (DPR) संबंधित कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे सनदी लेखापालामार्फत बनविलेला असल्याने या प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळास कोणतेही सेवा शुल्क वा इतर कोणतेही शुल्क देय असणार नाही.

१०. या शासन निर्णयान्वये या प्रकल्पास विभागाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत असून प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबतचा कार्यसिध्दी व मुल्यमापन अहवाल महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने शासनास सादर करावा.

११. या प्रकल्पाच्या अंमलबजावणीमध्ये कोणतीही दिरंगाई होणार नाही तसेच या प्रकल्पाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विनियोग विहीत कालावधीत होईल याची दक्षता

सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ यांनी घ्यावी तसेच निधी विनियोग प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे.

१२. सदर शासन परिपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेताक २०१००९२७२००२१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-
(श्रीकांत चं. आंडगे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :

१. प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. पणन संचालक, महाराष्ट्र शासन, पुणे
४. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
५. सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
६. सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती, अहेरी, ता. अहेरी, जि. गडचिरोली.
७. सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती, चामोर्शी, ता. चामोर्शी, जि. गडचिरोली.
८. निवड नस्ती.